202109151328502219

**राज्यामध्ये अतिवृष्टीमुळे जमिनीचे होणारे भूस्खलन तसेच दरड कोसळणे याबाबत अभ्यास करुन क्षेत्र निश्चितीकरण्यासाठी तज्ञसमिती गठीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र.२०९/आव्यप्र-१
मंत्रालय, मुंबई – ४०० ०३२.
दि. १५ सप्टेंबर,२०२१

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य हे आपत्तीप्रवण राज्य असून राज्याला दरवर्षी विविध आपत्तीचा सामना करावा लागतो. राज्यामध्ये येणाऱ्या आपत्तीपैकी दरड कोसळणे व भूस्खलन होणे ही एक भीषण आपत्ती असून राज्यामध्ये झालेल्या या दुर्घटनेत वित्तीय व मनुष्यहानी मोठ्या प्रमाणात झालेली आहे. सदर आपत्ती होण्याची संभाव्यता अभ्यास करण्यासाठी विविध प्राधिकरणाची मदत घेवून संभाव्य क्षेत्र निश्चित करण्यासंदर्भात मंत्रीमंडळ उपसमितीस सहाय्य करण्यासाठी तज्ञ समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यामध्ये उद्भवणाऱ्या दरड कोसळणे व भूस्खलन होणे या आपत्तीसंदर्भात प्रतिबंधात्मक उपाय म्हणून संभाव्य ठिकाणाची क्षेत्रनिश्चिती करण्याकरीता खालीलप्रमाणे तज्ञ समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पद |
|---|---|---|
| १ | प्रा. रवि सिन्हा, आयआयटी, मुंबई | अध्यक्ष |
| २ | श्री. प्रभाकर देशमुख | सदस्य |
| ३ | संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास संस्था | सदस्य |
| ४ | भारतीय भूवैज्ञानिक सर्वेक्षण (GSI)चे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | डॉ. सतीश ठिगळे, माजी भूशास्त्र विभाग प्रमुख, पुणे विद्यापीठ | सदस्य |
| ६ | डॉ. शिरीष रावण, प्रमुख (UN-SPIDER) | सदस्य |
| ७ | डॉ. भावना उंबरीकर, सहायक प्राध्यापक (भूगर्भशास्त्र विभाग, पुणे विद्यापीठ) | सदस्य |
| ८ | डॉ. टी. पी. सिंग, संचालक (सिम्बायोसिस इंन्स्टिट्युट ऑफ जिओ इन्फॉर्मेटिक, पुणे) | सदस्य |
| ९ | डॉ. अभिजित खांडगे, संचालक, झेनोलिथ जिओ सर्व्हिस | सदस्य |
| १० | कॉलेज ऑफ इंजिनीअरिंग, पुणे यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ११ | संचालक (आव्यप्र) | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(श्रीरंग घोलप)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत –

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) अपरमुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) विभागीय आयुक्त सर्व.
५) जिल्हाधिकारी, सर्व.
६) तज्ञ समितीचे सर्व सदस्य.
७) निवड नस्ती/ आव्यप्र-१.